प्रतिभा शिक्षण प्रसारक मंडळ, जनुना, ता.बार्शी टाकळी, जि.अकोला संचलित लालखेड, जि.अमरावती येथील प्राथमिक आश्रमशाळा, अष्टविनायक शिक्षण प्रसारक मंडळ, अहेरी,ता.अहेरी, जि.गडचिरोली या संस्थेस हस्तांतरीत व स्थलांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक - विभशा-२०१०/प्र.क्र. १० /मावक-६,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १ जून, २०१०

वाचा :-
१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : विभशा २००७/प्र.क्र. ९२/मावक-६, दिनांक १ ऑगस्ट, २००७
२) अध्यक्ष, अष्टविनायक शिक्षण प्रसारक मंडळ, अहेरी,ता.अहेरी, जि.गडचिरोली यांचा दिनांक २०.३.२०१० रोजीचा विनंती अर्ज.
३) संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.विजाभजसं/आशा/हस्तांतर/लालखेड-अमरावती/२००९-१०/४८८ दिनांक २० फेब्रुवारी, २०१०.

**प्रस्तावना :** - प्रतिभा शिक्षण प्रसारक मंडळ, जनुना, ता.बार्शी टाकळी, जि.अकोला संचलित लालखेड, जि.अमरावती येथील बंद असलेली आश्रमशाळा अष्टविनायक शिक्षण प्रसारक मंडळ, अहेरी,ता.अहेरी, जि.गडचिरोली या संस्थेस मिळण्याबाबत संस्थेच्या अध्यक्षांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने संचालक, विजाभज, पुणे यांच्याकडून प्रस्ताव मागविण्यात आला होता. संस्थेच्या सदर विनंतीनुसार संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्रमांक -३ अन्वये शासनाकडे प्रस्ताव सादर केला होता. शासन निर्णय, दिनांक १.८.२००७ च्या तरतूदीनुसार प्रतिभा शिक्षण प्रसारक मंडळ, जनुना, ता.बार्शी टाकळी, जि.अकोला संचलित लालखेड, जि.अमरावती येथील प्राथमिक आश्रमशाळा अष्टविनायक शिक्षण प्रसारक मंडळ, अहेरी,ता.अहेरी, जि.गडचिरोली या संस्थेस हस्तांतरीत व स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर विचार करुन शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :- प्रतिभा शिक्षण प्रसारक मंडळ, जनुना, ता.बार्शी टाकळी, जि.अकोला संचलित लालखेड, जि.अमरावती येथील प्राथमिक आश्रमशाळा अष्टविनायक शिक्षण प्रसारक मंडळ, अहेरी

ता.अहेरी, जि.गडचिरोली या संस्थेस मौ.शेगाव (बु.), ता. वरोरा, जि.चंद्रपूर येथे **अनुदान तत्वावर** हस्तांतरीत व स्थलांतरीत करुन सुरु करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

२. सदर संस्थेमध्ये १) सध्या कार्यरत असलेल्या मान्यताप्राप्त शिक्षकांना सामावून घेण्याच्या तसेच २) निवासी विद्यार्थी या नवीन संस्थेकडे वर्ग करण्याच्या अटींच्या अधिन राहून परवानगी देण्यात येत आहे.

३. अष्टविनायक शिक्षण प्रसारक मंडळ,अहेरी ता.अहेरी, जि.गडचिरोली या संस्थेला आश्रमशाळेबाबत शासनाने वेळोवेळी काढलेले निकषाचे व इतर आदेश, नियम व अटी बंधनकारक राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक साकेतांक २०१००६०११८२०५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( व.दा.राठोड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मंत्री, विजाभज यांचे खाजगी सचिव,
संचालक,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता),मुंबई
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता),नागपूर,

जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
विभागीय समाजकल्याण अधिकारी, नागपूर
विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी, चंद्रपूर / अकोला.
अध्यक्ष/ सचिव, अष्टविनायक शिक्षण प्रसारक मंडळ,अहेरी,ता.अहेरी, जि.गडचिरोली
अध्यक्ष / सचिव,प्रतिभा शिक्षण प्रसारक मंडळ, जनुना, ता.बार्शी टाकळी, जि.अकोला.
निवड नस्ती, का - मावक-६